केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शती अभियानांतर्गत वनशेती उपअभियान करीता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील केंद्र शासनाकडून पुनर्जिवित करुन दिलेला निधी वितरीत करणेबाबत..
केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ ए८४२) आणि राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ ए८५१)

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र.११ / कार्यासन. ६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: - २६ जूलै, २०१८.

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
२) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक ७-७/२०१७ -सी सी,दिनांक २३.०४.२०१८.
३) आदिवासी विकास विभाग, समक्रमांक शासन निर्णय दि.०२.०७.२०१८
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. शाशेअ -०७१८ / प्र. क्र.२१२(भाग-२)/ १४अे.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत वनशेती उपअभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंसाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २४०१, पीक संवर्धन, (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(३४) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- वनशेती उपअभियान (केंपुयो ) ( ६० टक्के केंद्र हिस्सा ) (अनुसूचित जमाती ) (२४०१ ए८४२), (३३ अर्थसहाय्य) करीता एकूण रु. ६६.७० लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून (०१)(३५) राष्ट्रीय शाश्वत शती अभियान- वनशेती उपअभियान (केंपुयो ) ( ४० टक्के राज्य हिस्सा ) (अनुसूचित जमाती ) (२४०१ ए ८५१), (३३ अर्थसहाय्य) करिता एकुण रु. ४४.४६ लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे. संदर्भीत क्र.३ येथे नमूद शासन निर्णयान्वये सदर तरतुदीतुन केंद्र हिश्श्याकरीता लेखाशिर्ष (२४०१ A८४२) - ३३ अर्थसहाय्य (केंद्र हिस्सा ) खाली रु. १८.८० लाख इतका निधी तर समरुप राज्य हिश्श्याकरीता लेखाशिर्ष (२४०१ A८५१ ) - ३३ अर्थसहाय्य खाली रु. १२.५३ लाख इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

२. आता, वाचा क्र. ४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार केंद्र शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत वनशेती उपअभियानाचा अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०१७-१८ या वर्षातील अखर्चित असलेला व केंद्र हिश्श्यापोटी शासन कोषागारात जमा करण्यात आलेला रु. ०.१० लाख इतका निधी पुनर्जिवित करुन दिलेला आहे. सदर केंद्र हिस्सा रु.०.१० लाख व त्यास समरुप राज्य हिस्सा रु. ०.०७ लाख उपलब्ध करणे आवश्यक आहे. तसेच वन शेती उपअभियानासाठी सन २०१७-१८ साठी केंद्र हिश्श्याचा रु.३७.४० इतका निधी खर्च झालेला असल्याने, परंतु त्याप्रमाणात राज्य हिश्श्याचा रु.२४.९३ लाख खर्च अपेक्षित असताना रु.२४.६९ लाख इतका निधी प्रत्यक्षात खर्च झालेला असल्याने केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात

राज्य हिश्श्यासाठी उर्वरित रु. ०.२४ लाख इतका निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार उपरोक्त योजनेच्या केंद्र हिश्श्यासाठी (२४०१ एट८४२), (३३ अर्थसहाय्य) या लेखाशिर्षाखाली रु. ०.१० लाख ( रुपये दहा हजार फक्त ) इतका निधी व राज्य हिस्सा म्हणून (२४०१ एट८५१), (३३ अर्थसहाय्य) या लेखाशिर्षाखाली रु. ०.३१ लाख (०.०७ लाख + रु.०.२४ लाख ) ( रुपये एकतीस हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तीक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२५१६४८४४३६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.07.26 13:16:37 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे.

३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग